**चंद्रपूर वन प्रबोधिनी संकुलातील नवीन इमारतीचे बांधकाम व पायाभूत सुविधा निर्मिती कामाकरीता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१७/प्र.क्र.३९२/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०६ सप्टेंबर, २०१८

वाचा :-

१. महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्रमांक :- वनबां-२०१६/प्र.क्र.६९/फ-९, दिनांक २७.०३.२०१७
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर, यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.४५/३७०/२०१८-१९, दि. ४.६.२०१८
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि.०२.०४.२०१८
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दि.२७.७.२०१८
५. महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्रमांक :- पुरवणी-२०१८/प्र.क्र.१७४/ब-१, दिनांक ३१.०७.२०१८.

प्रस्तावना :-

चंद्रपूर वन प्रबोधिनी संकुलातील नवीन इमारतीचे बांधकाम व पायाभूत सुविधा निर्मीती कामाच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये रु.१८६.०९ कोटी च्या खर्चास तांत्रिक तसेच प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने आतापर्यंत शासनाकडून रु.१४९.९७ कोटी निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला असून उर्वरित रक्कम रु.३६११.०४ लक्ष इतक्या रकमेची पुरवणी मागणी जुलै, २०१८ च्या अधिवेशनात मंजूर करण्यात आली आहे. वित्त विभागाने संदर्भ क्र.४ च्या परिपत्रकान्वये सन २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात मान्य करण्यात आलेल्या पुरवणी मागणीचा निधी वितरीत करण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार महसूल व वन विभागाने संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये सन २०१८-१९ चे खर्चाचे पूरक विवरणपत्र निर्गमित केले आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१८-१९ करिता महसूली शिर्षांतर्गत एप्रिल ते डिसेंबर या ९ महिन्यांच्या कालावधीकरिता ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय प्रणालीवर निधी वितरीत करण्याकरिता उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार सन २०१८-१९ मधील राज्यस्तरीय योजने अंतर्गत चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी, चंद्रपूर (२४१५ १०७७) या योजनेतंर्गत चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी, चंद्रपूर संकुलातील नवीन इमारतीचे बांधकाम व पायाभूत सुविधा निर्मिती कामाकरीता रु.२५२७.७२ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना विचारात घेता सन २०१८-१९ राज्य योजनेअंतर्गत चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी, चंद्रपूर या योजनेतंर्गत चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी, चंद्रपूर संकुलातील नवीन इमारतीचे बांधकाम व पायाभूत सुविधा निर्मिती कामाकरीता रु.२५२७.७२ लक्ष इतका निधी (२४१५-१०७७) या लेखाशिर्षा अंतर्गत खालील अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
३. प्रस्तावित सर्व कामांना सक्षम प्राधिकारी यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी आहे यांची खात्री करुनच कामे करावीत. तसेच सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.
४. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.
५. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.
६. प्रस्तावित कामांमध्ये निसर्गपूरक असलेले साहित्याचा जास्तीत जास्त वापर करावा.
७. सदर खर्च वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल याचे काटेकोर पालन करण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.
८. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक-सी-७, प्रधान शिर्ष २४१५, कृषी विषयक संशोधन व शिक्षण, २७७-शिक्षण, (००) (०३) “चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन अकादमी चंद्रपूर” (२४१५-१०७७) ३१- सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखा शिर्षाअंतर्गत सन २०१७-१८ मध्ये मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.२३०/व्यय-१०, दिनांक २१.०८.२०१८ अन्वये व वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१११११३४५५७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.09.11 11:42:45 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
५. संचालक, चंद्रपूर वन अकादमी, चंद्रपूर.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-१), मंत्रालय, मुंबई-३२.
८. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
९. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
१०.फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)